उप आयुक्त (पुरवठा), गट अ या संवर्गातील
अधिकाऱ्यांच्या बदल्या-२०२३.

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन आदेश क्रमांक : बदली-२३२३/प्र.क्र.१३५/ ना.पु.१५.**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
दिनांकः- २३ जून, २०२३.

वाचा:-१) महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५.
२) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.बदली-२०२३/प्र.क्र.३२/कार्या १२, दि.३० मे, २०२३.

**शासन आदेश-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या कलम ४(४) व ४(५) मधील तरतूदीनुसार सक्षम प्राधिकाऱ्याच्या मान्यतेनुसार **उप आयुक्त (पुरवठा), गट-अ** या संवर्गातील खालील तक्त्यात नमूद अधिकाऱ्यांच्या बदल्या त्यांच्या नावासमोरील स्तंभ ४ मध्ये दर्शविलेल्या ठिकाणी करण्यात येत आहे:-

| अ. क्र. | अधिकाऱ्याचे नाव | सध्या कार्यरत ठिकाण | बदलीनंतरचे पदस्थापनेचे ठिकाण |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १. | श्री.रमेश शेषराव आडे | उप आयुक्त (पुरवठा), नागपूर | श्री. अनिल बन्सोड यांच्या बदलीने रिक्त होणाऱ्या उप आयुक्त (पुरवठा), अमरावती या पदावर. |
| २. | श्री. अनिल हरिदास बन्सोड | उप आयुक्त (पुरवठा), अमरावती | श्री. रमेश शेषराव आडे, यांच्या बदलीने रिक्त होणाऱ्या उप आयुक्त (पुरवठा), नागपूर या पदावर. (विनंती बदली) |

२. वरील तक्त्यात नमूद अधिकाऱ्यांना दिनांक २३.०६.२०२३ (म.नं.) रोजी त्यांच्या नावासमोरील स्तंभ क्र.३ मध्ये नमूद ठिकाणाहून एकतर्फी कार्यमुक्त करण्यात येत आहे. संबंधित अधिकाऱ्यांनी बदलीच्या पदावर तात्काळ रुजू होणे अनिवार्य आहे व त्याबाबतचा रुजू अहवाल विभागीय आयुक्त व शासनास सादर करावा.

३. वरील तक्त्यातील श्री.रमेश शेषराव आडे यांची नियतकालिक बदली असल्याने त्यांना बदलीच्या ठिकाणी रुजू होण्याकरीता महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ मधील तरतुदीनुसार पदग्रहण अवधी तसेच बदली विषयक प्रवास भत्ता व इतर अनुषंगिक लाभ अनुज्ञेय राहतील.

४. वरील तक्त्यात नमूद बदली झालेल्या अधिकाऱ्यांनी बदली रद्द करणे अथवा त्यासाठी प्रत्यक्ष अथवा अप्रत्यक्षरित्या दबाव आणून बदली रद्द करण्याचा प्रयत्न केल्यास, ही कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ मधील नियम २३ चे उल्लंघन करणारी असल्यामुळे ती

गैरवर्तणूक समजून त्यांचे विरुध्द शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

५. वरीलप्रमाणे पदस्थापना करण्यात आलेल्या अधिकाऱ्याला पूर्वपरवानगीशिवाय कोणत्याही प्रकारची रजा मंजूर करु नये व महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम, १९८१ मधील नियम ३०(सी) नुसार मूळ कार्यालयाने पदस्थापना झालेल्या अधिकाऱ्याचे कोणत्याही प्रकारचे रजेचे अर्ज स्विकारू नयेत. असे अर्ज प्राप्त झाल्यास ते संबंधित अधिकाऱ्यास मूळ पत्त्यावर नोंदणी पोचदेय डाकेने परत करावेत.

६. तसेच उपरोक्त तक्त्यात नमूद बदली झालेल्या अधिकाऱ्यांनी बदली अधिनियमानुसार सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने पारीत केलेल्या आदेशाचे पालन न करणे ही बाब गंभीर स्वरूपाची असून यामुळे पालन न करणारा अधिकारी, विभागीय चौकशी नियम पुस्तिका, १९९१ च्या प्रकरण २ मधील कलम-२.१(२) (पाच) अन्वये निलंबनाच्या कार्यवाहीस पात्र ठरेल.

७. सदरील बदली आदेशाची तातडीने अमंलबजावणी होण्यासाठी आवश्यक ती कार्यवाही संबंधित विभागीय आयुक्त यांनी करावी व त्याबाबतचा अहवाल शासनास सादर करण्यात यावा.

८. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०६२३१५१९१३७३०६ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

TATOBA MARUTI KOLEKAR

Digitally signed by TATOBA MARUTI KOLEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FOOD CIVIL SUPPLIES AND CONSUMER PROTECTION DEPARTMENT,
2.5.4.20=f6809ddecc0e0507860e37e9935ab3a7013510f4fe04fad27512588a0bc8e15f,
postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=9915405908628D01955F3675ACC122F51E0C39F63F7CC88EEC49CD05616991FD, cn=TATOBA MARUTI KOLEKAR
Date: 2023.06.23 17:40:33 +05'30'

**( ता. मा. कोळेकर )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

संबंधित अधिकारी (यांना संबंधित विभागीय आयुक्त यांच्यामार्फत.)

**प्रत:-**

१) विभागीय आयुक्त, अमरावती/नागपूर.
२) सर्व उप आयुक्त(पुरवठा).
३) उप आयुक्त(पुरवठा), अमरावती/नागपूर.
४) मा.मंत्री (अ.ना.पु. व ग्रा.सं.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) सचिव (अ.ना.पु. व ग्रा.सं.) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
७) सर्व जिल्हा पुरवठा अधिकारी.
८) सर्व अन्नधान्य वितरण अधिकारी.
९) जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती/नागपूर.
१०) कक्ष अधिकारी, सर्व कार्यासने, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) निवड नस्ती (ना.पु.-१५).